प्रशासकीय मान्यता

सन २०१९ - २०२० दरम्यान केंद्र शासनाकडून पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धअंतर्गत प्राप्त अनुदानातून यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

डॉ. शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,नांदेड

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : एससीएन-२०२०/प्र.क्र.२५/प्रशा-१
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक : ३० जानेवारी, २०२०

**वाचा** :
1) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
2) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
3) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
4) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/म/डॉ.शंचशावैमनां/ यंत्रभंडार/यंत्रसामुग्री/२४१/२०१९, दिनांक : ०७.०१.२०२०
5) शासन पत्र क्र. पीजीएन -२०१९/प्र. क्र. २९५ /प्रशा-१, दि. १९.११.२०१९

**शासन निर्णय :-**

डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नांदेड या संस्थेस केंद्र शासनाच्या ११ व्या पंचवार्षीक योजनांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धन योजनेंतर्गत केंद्र शासन हिस्साअंतर्गत मंजूर अनुदानातून उपलब्ध होणाऱ्या निधीतून पुढील तक्त्यात नमूद रुपये १३,३९,२४,८९४/- ( अक्षरी तेरा कोटी एकोनचाळीस लक्ष चोवीस हजार आठशे चौ-यान्नव रुपये फक्त ) ची यंत्रसामुग्री खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | यंत्राचे नांव | नग | दर | एकुण किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | न्युरो सर्जीकल ड्रील ॲन्ड सॉ सिस्टीम | ०१ | १८,८२,८७० | १८,८२,८७० |
| २ | ऑपरेटिंग मायक्रोस्कोप फॉर स्पाईन ऑपरेशन | ०१ | ३७,३५,४२४ | ३७,३५,४२४ |
| ३ | डिजीटल रेडिऑग्राफी एक्सरे युनिट (फ्लेट | ०१ | ४०,००,००० | ४०,००,००० |

| अ.क्र. | यंत्राचे नांव | नग | दर | एकुण किंमत |
|---|---|---|---|---|
| | पॅनल टाईप) | | | |
| ४ | मल्टी पॅरा मॉनिटर | १६ | ९४,००० | १५,०४,००० |
| ५ | प्लास्मा स्टरलायझर | ०१ | ५०,००,००० | ५०,००,००० |
| ६ | आय.सी.जी. लॅप्रोस्कोपी सिस्टीम | ०१ | ६०,००,००० | ६०,००,००० |
| ७ | कॉटरी वीथ अे.पी.सी. | ०२ | १४,००,००० | २८,००,००० |
| ८ | व्हीडीओ एन्डोस्कॉपी सिस्टम वीथ नॅरो बँड इमेजींग (एन.बी.आय.) | ०१ | १,००,००,००० | १,००,००,००० |
| ९ | पेरीमिटर | ०२ | १९,५०,००० | ३९,००,००० |
| १० | ईन्डायरेक्ट ऑप्थाल्मोस्कॉप | ०२ | १,७१,००० | ३,४२,००० |
| ११ | स्लीट लॅम्प वीथ डिजीटल कॅमेरा | ०२ | १३,००,००० | २६,००,००० |
| १२ | ऑप्टीकल कॉहेरेन्स टोमोग्राफी वीथ फन्डस कॅमेरा | ०२ | ३०,००,००० | ६०,००,००० |
| १३ | ऑटोमेटेउ रॅपीड बॅक्टेरीयल आयडेंटीफिकेशन अँड अँटीबायोटीक ससेप्टीबीलीटी वर्कस्टेशन वीथ रिएजेंटस | ०१ | १,७८,४१,६०० | १,७८,४१,६०० |
| १४ | ऑटोमेटेड इम्युनोएसे सिस्टम | ०१ | १६,००,००० | १६,००,००० |
| १५ | बायनाक्युलर मायक्रोस्कोप | १५५ | १,००,००० | १,५५,००,००० |
| १६ | बायोसेफ्टी कॅबीनेट टाईप II A२ | ०२ | ३,००,००० | ६,००,००० |
| १७ | एलायझा रिडर | ०२ | २,५५,००० | ५,१०,००० |
| १८ | एलायझा वॉशर | ०२ | २,६०,००० | ५,२०,००० |
| १९ | लॅमिनार एअरफलो वर्कस्टेशन | ०२ | १,५०,००० | ३,००,००० |
| २० | अे.बी.जी. मशीन | ०१ | ४,००,००० | ४,००,००० |
| २१ | बबल सी-पॅप | १० | ३,५०,००० | ३५,००,००० |
| २२ | मल्टी पॅरा मॉनिटर वीथ सेंट्रल मोनिटरिंग सिस्टम | २४ | १,५०,००० | ३६,००,००० |
| २३ | हाय फ्रिक्वंसी न्युओनेटल व्हेन्टीलेटर | ०५ | २०,००,००० | १,००,००,००० |
| २४ | सिरिंज पम्प | ६० | ३०,००० | १८,००,००० |
| २५ | पॉर्टेबल एक्स-रे मशीन | ०२ | ३,००,००० | ६,००,००० |
| २६ | इन्फयुजन पम्प | ६० | ३५,००० | २१,००,००० |
| २७ | ॲनेस्थेसिया वर्क स्टेशन (ॲप्रेटम) फॉर ई.सी.टी. | ०१ | १८,००,००० | १८,००,००० |
| २८ | फुल्ली ऑटोमेटेड एलायझा रिडर | ०१ | १०,००,००० | १०,००,००० |
| २९ | सेमी ऑटो ॲनालाईझर | ०४ | २,००,००० | ८,००,००० |
| ३० | ईम्युनोएस्से ॲनालाईझर केमिलीम्युनीसेन्स | ०१ | ५०,००,००० | ५०,००,००० |

| अ.क्र. | यंत्राचे नांव | नग | दर | एकुण किंमत |
|---|---|---|---|---|
| ३१ | ईलेक्ट्रोफोरसीस चेंबर | ०१ | १२,५४,००० | १२,५४,००० |
| ३२ | फुल्ली ऑटो ॲनालाईझर | ०२ | २२,५०,००० | ४५,००,००० |
| ३३ | लेझर युनिट | ०१ | ६८,००,००० | ६८,००,००० |
| ३४ | मायक्रोनिडल आर.एफ. मशीन | ०१ | ५,३१,००० | ५,३१,००० |
| ३५ | फोटोथेरपी होलबॉडी युनिट | ०१ | ५,०४,००० | ५,०४,००० |
| ३६ | हाय परफोरर्मन्स लिक्वीड क्रोमाटोलॉजी (एच.पी.एल.सी.) | ०१ | ५१,००,००० | ५१,००,००० |
| | | | एकूण | १३,३९,२४,८९४ |

अटी :-

१. सदर प्रशासकीय मान्यता केंद्र शासनाच्या ११ व्या पंचवार्षीक योजनांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धन योजनेंतर्गत केंद्र शासनाचा राज्य शासनास प्राप्त झालेला निधी सदर आर्थिक वर्षात वापरण्यास परवानगी मिळणेबाबत उपरोक्त दिनांक १९.११.२०१९ च्या पत्रान्वये केंद्र शासनास पाठविलेल्या प्रस्तावास मान्यता मिळण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता तसेच बांधकाम / विद्युतीकरणाची नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा केली आहे.

३. सदर यंत्र सामुग्री संबंधित केंद्र- राज्य योजनेतंर्गत अनुज्ञेय आहे, याची खातरजमा संबधित संस्थेने केली आहे.

४. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

५. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक ( वै.शि. ) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

७. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

८. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

९. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

१०. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

११. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे खरेदी समितीने अनुपालन करावे. त्यानुषंगाने यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

**२.** या प्रयोजनासाठी येणारा खर्च संस्थेस खालील लेखाशिर्षाखालील मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक एस-४

| | |
|---|---|
| ४२१० | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | वैद्यकीय शिक्षण व संशोधन |
| १०५ | विषमचिकित्सा राज्य योजनांतर्गत योजना |
| (३९) (००) | राज्य शासकीय वैद्यकीय महाविद्यालयांचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे व नवीन पदव्युत्तर पाठयक्रम सुरु करणे व पदव्युत्तर विद्यार्थ्यांच्या संख्येत वाढ करणे (४२१० २४३८) |
| ५२ | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री |

**३.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१३०१७२२५६१३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHAR RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.30 17:13:11 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.

२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, डॉ. शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय,नांदेड
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड .
६. निवडनस्ती (प्रशा-१).